**शैक्षणिक वर्ष २०२३-२४**
**नवीन महाविद्यालयांना अंतिम**
**मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन आदेश क्रमांकः-मान्यता-२०२३/प्र.क्र.९५/मशि-४**
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२
दिनांक:- १५ जून, २०२३.

संदर्भ:-१. शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र. मान्यता-२०२३/प्र.क्र.६३/मशि-४, दिनांक ०१.०४.२०२३
२. शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र. एनजीसी २०१७/(२९/१७)/मशि-४, दिनांक १५.०९.२०१७

**शासन आदेश :-**

शैक्षणिक वर्ष २०२३-२४ पासून नवीन महाविद्यालय सुरु करण्यास महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ अधिनियम, २०१६ मधील कलम १०९ आणि संदर्भाधीन दिनांक १५.०९.२०१७ च्या शासन निर्णयान्वये विहित केलेल्या कार्यपद्धतीनुसार संदर्भ क्र.१ अन्वये इरादापत्र प्रदान करण्यात आले आहे.

आता, महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ अधिनियम, २०१६ मधील कलम १०९ (३) (च) अन्वये शैक्षणिक वर्ष २०२३-२४ साठी अकृषी विद्यापीठांनी नवीन महाविद्यालय सुरु करण्यास अंतिम मान्यता मिळण्याबाबतचे अनुपालन अहवाल सकारात्मक शिफारशीसह शासन मान्यतेसाठी शिफारशीत केले आहेत. संदर्भ क्र.२ येथील दिनांक १५.०९.२०१७ च्या शासन निर्णयामधील परिशिष्ट - "क" मध्ये विहित करण्यात आलेल्या निकषानुसार सदर प्रस्तावांची तपासणी करण्यात आली असून महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ अधिनियम, २०१६ मधील कलम १०९ (३) (छ) खालील परंतुकानुसार शासनास असलेल्या अधिकारांचा वापर करुन सोबतच्या विवरणपत्र-अ मध्ये नमूद केलेल्या एकूण १५ नवीन महाविद्यालयांना शासनाने विहित केलेल्या खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून **कायम विना अनुदान तत्वावर** अंतिम मान्यता देण्यात येत आहे.

२. **अटी व शर्ती :-**

१. सदर महाविद्यालयाची मान्यता ही शासनाच्या प्रचलित धोरणानुसार कायम विनाअनुदानित तत्वावर राहील. तसेच सदर महाविद्यालयाच्या शिक्षक व शिक्षकेतर कर्मचा-यांचे वेतन व वेतनेतर दायित्व शासनावर असणार नाही.

२. नवीन महाविद्यालय/ संस्थेने त्यांच्या विभागीय सहसंचालकांकडे ते भविष्यात कोणत्याही परिस्थितीत अनुदानाची मागणी करणार नाहीत असे हमीपत्र रु.१००/- च्या नॉन ज्युडीशियल स्टॅम्प पेपरवर सादर करावे.

३. महाविद्यालये/ संस्थेने हमीपत्र सादर केल्याशिवाय आणि तसे विभागीय सहसंचालकांचे प्रमाणपत्र प्राप्त झाल्याशिवाय संबंधित विद्यापीठाने संलग्नतेची प्रक्रीया सुरु करु नये.

४. महाविद्यालयाने संबंधित विद्यापीठाने विहित केलेल्या निकषांनुसार व विद्यापीठ अनुदान आयोगाने विहित केलेल्या शैक्षणिक पात्रतेनुसार अध्यापक / कर्मचारी वर्ग नेमणे आवश्यक असून, इतर सर्व आवश्यक पायाभूत सोयी उपलब्ध कराव्यात व त्याची खात्री विभागीय सहसंचालकांनी करावी आणि तद्नंतरच उपरोक्त अट क्र. २ मधील प्रमाणपत्र विद्यापीठास द्यावे.

५. महाविद्यालयाने कोणत्याही परिस्थितीत मंजूर प्रवेश क्षमतेपेक्षा जास्त प्रवेश देऊ नयेत.

६. विद्यापीठ अनुदान आयोगाच्या (ऑफिलिएशन ऑफ कॉलेजस बाय युनिव्हर्सिटीज) रेग्युलेशन, २००९ मध्ये महाविद्यालयांना संलग्नीकरण देण्याबाबत विहित निकषांची पूर्तता केल्याशिवाय संबंधित महाविद्यालयांना संलग्नीकरण देण्याची कार्यवाही विद्यापीठाने करु नये.

७. मंजूर करण्यात आलेल्या महाविद्यालयाने सक्षम प्राधिकरणाने विहीत केलेल्या कालमर्यादेत नॅक मुल्यांकन करुन घेण्यासाठी प्रयत्न करावा व याबाबत पाठपुरावा करण्याची जबाबदारी संबंधित विद्यापीठाची राहील.

८. लिगल एज्युकेशन अधिनियम, २००८ व तद्नुषंगिक नियमांतील तरतूदीनुसार मान्यताप्राप्त नवीन महाविद्यालयाने बार कौन्सिल ऑफ इंडियाची (B.C.I.) प्रकरणपरत्वे मान्यता / संलग्निकरण घेण्याची कार्यवाही विहीत कालावधीत करावी.

९. ज्या शैक्षणिक वर्षासाठी महाविद्यालय सुरु करण्यास परवानगी देण्यात आलेली आहे, त्या शैक्षणिक वर्षात महाविद्यालय सुरु करणे आवश्यक आहे. संलग्निकरण किंवा इतर शिखर संस्था/ केंद्रीय नियामक मंडळे यांची परवानगी मिळण्यास विलंब झाल्यामुळे जर महाविद्यालय त्या शैक्षणिक वर्षात सुरु होऊ शकले नाही तर, त्या शैक्षणिक वर्षांच्या पुढील शैक्षणिक वर्षात महाविद्यालय सुरु करणे अनिवार्य राहील. अन्यथा दिलेली परवानगी आपोआप रद्द समजण्यात येईल.

३. संबंधित विद्यापीठाने संलग्नीकरण देण्याबाबत आवश्यक असलेली पुढील कार्यवाही करण्यापूर्वी शासन मान्यता आदेशांचे अवलोकन केल्याशिवाय व संबंधित विभागीय सहसंचालकाचे अट क्रमांक २ मधील प्रमाणपत्र मिळाल्याशिवाय संलग्नता देण्याची प्रक्रिया सुरु करु नये. विद्यापीठांनी संलग्नतेबाबतचा पूर्तता अहवाल संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे व संबंधित विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण यांना पाठवावा.

४. संबंधित विद्यापीठाने व विभागीय सहसंचालकांनी मंजूर करण्यात आलेल्या नवीन महाविद्यालयांचा नियतकालिक आढावा घेऊन सदर महाविद्यालयांमध्ये मंजुर विद्यार्थी संख्येच्या ५०%

किंवा त्यापेक्षा कमी विद्यार्थी दिसून आल्यास सदर महाविद्यालयांची मान्यता रद्द समजून तसे विभागीय सहसंचालकांनी आदेश काढावेत आणि ते शासन व संबंधित विद्यापीठाकडे पाठवावेत. मा. उच्च न्यायालयाच्या नागपूर खंडपीठ, नागपूर येथे दाखल झालेल्या याचिका क्रमांक २४४६/२०१३ व २४४८/२०१३ मध्ये उपस्थित केलेल्या बाबी विचारात घेता या अटी संदर्भात आवश्यक ती कार्यवाही करण्याची जबाबदारी सबंधित विद्यापीठ व विभागीय सहसंचालक यांची राहील.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२३०६१५१५०६३१५९०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRATAP PANDURANG LUBAL

Digitally signed by PRATAP PANDURANG LUBAL
DN: CN = PRATAP PANDURANG LUBAL, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT
Date: 2023.06.16 01:54:58 +05'30'

**(प्रताप पां. लुबाळ)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे अप्पर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. मंत्री (उ.व तं.शि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. प्रधान सचिव (उ.व तं.शि.वि.), मंत्रालय, मुंबई.
६. आयुक्त, राज्य सामायिक प्रवेश परीक्षा कक्ष, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७. सचिव, प्रवेश नियामक प्राधिकरण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
८. कुलसचिव, सर्व अकृषी विद्यापीठे, महाराष्ट्र राज्य.
९. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०. सर्व संबंधित विभागीय सहसंचालक, महाराष्ट्र राज्य.
११. निवडनस्ती (मशि-४).

विवरणपत्र-अ

**शासन निर्णय क्रमांक :- मान्यता- २०२३/प्र.क्र. ९५/मशि-४, दिनांक १५ जून, २०२३ सोबतचे सहपत्र.**

| अ.क्र | क्र. | संस्था/महाविद्यालयाचे नांव | विद्याशाखा व अभ्यासक्रम |
|---|---|---|---|
| | | **मुंबई विद्यापीठ, मुंबई** | |
| १. | १. | वनमाला एज्यूकेशनल ॲन्ड चॅरिटेबल ट्रस्ट, मनोरमा नगर, कोलशेत रोड, ढोकाळी, ठाणे -400607<br>धर्मवीर आनंद दिघे साहेब महाविद्यालय, ठाणे महानगरपालिका शाळा क्र. 110, गांधीनगर, ठाणे (प.) गांधीनगर, ठाणे-400607 | 1) बी.ए. (0-120)<br>2) बी. कॉम. (0-120)<br>2) बी. एस्सी (0-120) |
| २. | २. | माऊली शिक्षण प्रसारक मंडळ मु जामघर पो. नेहरोली, ता. वाडा.जि. पालघर-421312<br>ह भ प सिता नकुल पाटील विधी कॉलेज पडघे,माँ साहेब मिनाताई ठाकरे कॉम्प्लेक्स पोलीस स्टेशन जवळ, पडघे, भिवंडी, ठाणे-421101 | 1) विधी (3 वर्षे) (0-60) |
| ३. | ३. | वाय. ॲन्ड एम. अंजूमन खैरूल ईस्लाम ट्रस्ट<br>पहिला मजला, बैतुल अमन को-ऑप हौ. सोसायटी, दुसरे मौलाना आझद रोड, नागपाडा, मुंबई- 400 008<br>वाय. ॲन्ड एम. ए. के. आयेस कॉलेज ऑफ आर्टस, सायन्स ॲन्ड कॉमर्स,<br>गोरेगांव, लोणेरे श्रीवर्धन रोड, गोरेगांव, ता. माणंगाव, जि. रायगड-४02103 | 1) बी. कॉम.(0-120) |
| | | **सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठ, पुणे** | |
| ४. | १. | ग्रीन वर्ल्ड फौंडेशन पत्ता: शिरेगाव पोस्ट खेडलेपरमानंद ता नेवासा जिल्हा अहमदनगर पिन 414105 ता: नेवासा जि:अहमदनगर पिन : 414105<br>आर्य वरिष्ठ महाविद्यालय मांजरी पत्ता: मांजरी ता: राहुरी जि:अहमदनगर पिन : 413705 | सर्वसाधारण<br>वाणिज्य व व्यवस्थापन-बी.कॉम.<br>विज्ञान व तंत्रज्ञान- बी.एस्सी.<br>मानवविज्ञान- बी. ए. |
| ५. | २. | नाशिक जिल्हा अहिल्यादेवी शिक्षण प्रसारक मंडळ जळगाव (नि) ता. मालेगाव जि. नाशिक पत्ता: मु. पो. जळगाव (नि) ता. मालेगाव जि. नाशिक ता: मालेगाव जि:नाशिक पिन : 423104<br>रोडु आण्णा गोविंदराव पाटील वरिष्ठ महाविद्यालय जळगाव नि. ता. मालेगाव जि . नाशिक पत्ता: जळगाव निंबायत ता: मालेगाव जि:नाशिक पिन : | सर्वसाधारण<br>वाणिज्य व व्यवस्थापन-बी.कॉम.<br>विज्ञान व तंत्रज्ञान- बी.एस्सी.<br>मानवविज्ञान- बी. ए. |

| अ.क्र | क्र. | संस्था/महाविद्यालयाचे नांव | विद्याशाखा व अभ्यासक्रम |
|---|---|---|---|
| | | 423104 | |
| ६. | ३. | राजमाता जिजाऊ महिला मंच पत्ता: 2337, बालाजी चेंबर्स , तळेगाव -चाकण रोड, तळेगाव स्टेशन (दाभाडे), ता.मावळ, जि.पुणे 410507 ता: मावळ जि:पुणे पिन : 410507<br>विश्वकमल महाविद्यालय पत्ता: तळेगाव ता: मावळ जि:पुणे पिन : 410507 | सर्वसाधारण<br><br>विज्ञान व तंत्रज्ञान-<br>बी.एस्सी.सायबर आणि डिजिटल सायन्स- शिफारस आहे. |
| | | **शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर** | |
| ७. | १. | बाळासाहेब बाडे फौंडेशन पुनाळ, ता.पन्हाळा, जि.कोल्हापूर संचलित सरदार रामचंद्र बाडे आर्ट्स, कॉमर्स, सायन्स महाविद्यालय, पुनाळ, ता.पन्हाळा, जि.कोल्हापूर. | कला<br>वाणिज्य<br>विज्ञान |
| ८. | २. | दि न्यू एज्युकेशन सोसायटी, धामोड, ता.राधानगरी, जि.कोल्हापूर संचलित तुळशी-धामणी कला, वाणिज्य आणि विज्ञान महिला महाविद्यालय धामोड, ता.राधानगरी, जि.कोल्हापूर | कला<br>वाणिज्य<br>विज्ञान |
| ९. | ३. | सिंधु एज्युकेशन सोसायटी, गांधीनगर, ३/१ गांधीनगर, कोल्हापूर संचलित सिंधू सिनिअर कॉलेज, गांधीनगर, रि.स.नं.४१८, गडमुडशिंगी, ता.करवीर, कोल्हापूर. | कला<br>वाणिज्य<br>विज्ञान |
| १०. | ४. | आजरा महाल शिक्षण मंडळ, आजरा, ता.आजरा, जि.कोल्हापूर संचलित व्यंकटराव कला, वाणिज्य, विज्ञान महाविद्यालय, आजरा, ता.आजरा, जि.कोल्हापूर | कला<br>वाणिज्य<br>विज्ञान |
| ११. | ५. | ज्ञान विज्ञान शिक्षण प्रसारक, मंडळ, बहिरेश्वर, ता.करवीर, जि.कोल्हापूर संचलित सुर्यकांत सदाशिव दिंडे (बापू) कला, वाणिज्य व विज्ञान महाविद्यालय, गणेशवाडी (बीडशेड), ता.करवीर, जि.कोल्हापूर. | कला<br>वाणिज्य<br>विज्ञान |
| | | **कवयित्री बहिणाबाई चौधरी उत्तर महाराष्ट्र विद्यापीठ, जळगाव.** | |
| १२. | १. | सनराईज फाउंडेशन, नंदुरबार प्लॉट नंबर 6 विरल विहार खोडाई माता रोड नंदुरबार-४२५४१२<br>सनराईज फाउंडेशन नंदुरबार संचलित आर. पी. वळवी आर्टस, कॉमर्स व सायन्स महाविद्यालय, तोरणमाळ, ता.धडगांव जि. नंदुरबार – ४२५४१२ | बी.ए.<br>बी.कॉम<br>बी.एस्सी. |

| अ.क्र | क्र. | संस्था/महाविद्यालयाचे नांव | विद्याशाखा व अभ्यासक्रम |
|---|---|---|---|
| | | **संत गाडगे बाबा अमरावती विद्यापीठ, अमरावती** | |
| **१३.** | **१.** | आधार बहुउद्देशिय शिक्षण संस्था, जयस्वाल ले-आऊट, बुलढाणा, ता. जि. बुलढाणा स्व. दयासागरजी महाले कला, विज्ञान व वाणिज्य महाविद्यालय, उदय नगर (उन्द्री), ता.चिखली, जि.बुलढाणा. | कला(मानव विज्ञान विद्याशाखा)<br>विज्ञान(विज्ञान व तंत्रज्ञान विद्याशाखा)<br>वाणिज्य (वाणिज्य व व्यवस्थापन विद्याशाखा) |
| | | **गोंडवाना विद्यापीठ, गडचिरोली** | |
| **१४.** | **१.** | श्री. माता कन्यका सेवा संस्था, चंद्रपूर, जि.चंद्रपूर, स्व. डॉ. सच्चिदानंद मुनगंटीवार रात्रपाळी महाविद्यालय, वडगाव, जि. चंद्रपूर | कला, वाणिज्य व विज्ञान |
| **१५.** | **२.** | श्री. माता कन्यका सेवा संस्था, चंद्रपूर, जि.चंद्रपूर, शुरवी महिला महाविद्यालय, कोठारी, ता. बल्लारपूर, जि. चंद्रपूर | कला, वाणिज्य व विज्ञान |

PRATAP PANDURANG LUBAL

Digitally signed by PRATAP PANDURANG LUBAL
DN: CN = PRATAP PANDURANG LUBAL, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT
Date: 2023.06.16 01:55:10 +05'30'

**(प्रताप पां. लुबाळ)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**